# पक्षी-जीवन

## २

लेखिका :

**शैलजा रॉबर्ट ग्रब**

निसर्ग-अभ्यास नियोजक

बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटी



अनौपचारिक शिक्षण राज्य साधन-केंद्र

इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन,

१२८/२ कर्वे रोड, कोथरूड, पुणे ४११ ०२९

पक्षी-जीवन [ २ ]

पहिली आवृत्ती : जुलै १९८३

संपादक : प्रकाशक

**डॉ. चित्रा नाईक**
संचालक,
अनौपचारिक शिक्षण राज्य साधन-केंद्र,
इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्युकेशन, पुणे २९



मुखपृष्ठ : मधु पाटील

**किंमत : रु. दोन**

मुद्रक :

**य. श्री. रणदिवे**
महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय,
९१५/१ शिवाजीनगर,
पुणे ४११ ००४

# प्रास्ताविक

नवसाक्षर प्रौढ, अल्पशिक्षित प्रौढ, साक्षरता मिळून शाळेबाहेर पडलेली मुले ह्या सर्वांना भरपूर वाचनसाहित्य उपलब्ध झाले तरच त्यांची साक्षरता टिकेल, वाढीला लागेल. अशा वाचकांसाठी वाचनसाहित्याची निर्मिती, हे आमच्या अनौपचारिक शिक्षण राज्य साधन-केंद्राचे एक महत्त्वाचे अंग आहे. वाचनसाहित्य विविध विषयांवर असावे आणि त्यातून माहिती मिळावी, त्याचप्रमाणे वाचकांचे रंजनही व्हावे, ह्या दृष्टिकोनातून साहित्य-निर्मिती केली जाते. अशा साहित्यापैकी ‘पक्षी-जीवन’ आज सादर करीत आहोत.

आपण निरनिराळया रंगांचे, लहान-मोठ्या आकारांचे, पुष्कळ पक्षी पाहतो. काही नेहमी, काही कधी कधी. ह्या पक्ष्यांपैकी काहींची केवळ नावेच आपल्याला माहीत असतात. पुष्कळांची तर नावेही माहीत नसतात. पक्ष्यांच्या संदर्भात आपल्या सामाजिक जीवनात आपण काही शुभ-अशुभ अशा कल्पनाही मनात बाळगलेल्या असतात. आपल्या धार्मिक रूढीसमजुती-मुळेही काही पक्ष्यांना आपण जवळ केले आहे तर काहींना दूर केले आहे. खरे म्हटले तर पक्षी तेवढे सारखेच. शुभ-अशुभ हा आपल्या मनाचा खेळ असतो.

आपल्या अवती-भवती असणाऱ्या पक्ष्यांची खऱ्या अर्थाने आपल्याला नीटशी ओळखच नसते. आमच्या नवसाक्षर प्रौढ वाचकांना ती ओळख करून यावी, ह्या हेतूने हे पुस्तक श्रीमती शैलजा ग्रब ह्यांनी मेहनत घेऊन तयार केले. त्यांचे आम्ही ऋणी आहोत.

चित्रा नाईक

## अनुक्रम



# बगळा



छोटा बगळा      गाय बगळा

गावाकडे काय पण भर शहरवस्तीतही बगळे कुठेही सहज दिसतात. गाईम्हशींच्या पाठीवर बसून आरामात चाललेले हे पांढरे पक्षी अनेकांना माहीत असतील. गाईम्हशींच्या बरोबर असणाऱ्या त्यांच्या सहजीवनामुळे त्यांना 'गायबगळा' असे नाव मिळाले आहे.

पावसाळ्याच्या सुरुवातीला यांच्या माना व डोकी तांबडट झालेली दिसतात. जून ते सप्टेंबर हा त्यांच्या विणीचा हंगाम. एरव्ही पांढरेशुभ्र असणारे हे पक्षी विणीच्या हंगामात डोळे व मान तांबडट झाल्यामुळे वेगळेच दिसू लागतात. गाईम्हशी शेतातून अथवा गवतातून चालत असताना त्यांच्या चालण्यामुळे कितीतरी टोळ, नाकतोडे व अन्य कीटक उडतात. बगळे हे बरोबर टिपून खातात. याशिवाय छोटे छोटे मासे, बेडकाची छोटी छोटी पिल्ले यावरही ते ताव मारतात. ह्यांची घरटी उंच उंच झाडावर वसाहतीने दिसून येतात. एकेका झाडावर २०/२५ घरटी सहज दिसतात. गायबगळ्याच्या पांढऱ्या शुभ्र अंगाला, त्याची पिवळी चोच आणि काळे पाय उठून दिसतात.

गायबगळ्याव्यतिरिक्त आणखी एक प्रकारचे पांढरे बगळे शेतात बांधावरून चालताना दिसतात. ते सारखे खाली माना घालून शेतातून काहीतरी टिपून घेताना दिसतात. हे रंगरूपाने आणि आकाराने गायबगळ्यांसारखेच असतात. पण नीट निरखून पाहिल्यास त्यांच्या चोची पिवळ्या नसून काळ्या असल्याचे दिसून येईल. आणखी एक फरक त्यांच्या पायाकडे पाहिल्यास लक्षात येईल. गायबगळ्यासारखे त्यांचे पाय काळे नसून पिवळे असतात. हे देखील एक प्रकारचे बगळेच. आपण त्याला 'छोटा बगळा' म्हणू. छोट्या बगळ्यांची घरटी देखील गाय-बगळ्यांप्रमाणे उंच उंच झाडांवर त्यांच्यासोबतच दिसून येतात. हे सर्व पक्षी जाड जाड काटक्या-कुटक्या जमवून साधारण कावळ्या-सारखीच थोडीशी अस्ताव्यस्त अशी घरटी बांधतात.

ह्या छोट्या बगळ्याच्या डोक्यावर विणीच्या हंगामात गाय-बगळ्यासारखी तांबडट पिसे न उगवता त्याच्या डोक्यावर तुरा खोवल्यासारखी दोनचार पांढरी पिसे उगवतात.



गायबगळा आणि छोटा बगळा ह्यांच्या व्यतिरिक्त आणखी एक मातकट रंगाचा पक्षी (एक प्रकारचा बगळाच) शेतामध्ये दिसून येतो. ह्याला हिंदीमध्ये 'अंधा बगुला' म्हणतात. हे पक्षी मोठे लबाड असतात. स्थिर उभे राहून मासे आवाक्यात आल्याबरोबर पटकन चोच मारून टिपून खातात. तोपर्यंत आंधळ्यासारखे डोळे मिटून उभे राहिल्यासारखे वाटतात. परंतु ते एकाग्रपणे डोळे खाली वळवून एकटक आपल्या भक्ष्याची वाट पाहात असतात. हे पक्षी बसले असता मातकट रंगाचे दिसतात. नदी-ओढ्याच्या काठाच्या चिखलाशी मिळता-जुळता रंग असल्याने नीट पाहिल्या-शिवाय दिसूनही येत नाही. परंतु उडत असताना पांढऱ्याच रंगाचे असल्यासारखे वाटतात. तेव्हा खालून पाहिले असताना गायबगळेच उडत असावेत असे वाटते. कारण त्यांच्या पोटाकडचा भाग व पंख खालून वरून पांढरेशुभ्र असतात. फक्त पाठीचा रंग हिरवट-मातकट असतो. मानेवर पिवळट रंग असून त्यावर काळसर रेषा असतात. पाय हिरवट रंगाचे असून शरीराच्या मानाने लांबट असतात.

हे पक्षी मुख्यत: छोटे बेडूक, मासे, खेकडे व इतर कीटक खाऊन राहतात. मे ते सप्टेंबरमध्ये घरटी बांधून अंडी घालतात. ह्यांची घरटीदेखील दुसऱ्या प्रकारच्या बगळ्यांमध्येच वसाहतीने आढळतात. मादी एका वेळेस ३ ते ५ अंडी घालते. ती फिक्कट हिरव्या रंगाची असतात.

बगळ्यांमध्ये नर व मादी दोघे मिळून पिलांचे संगोपन करतात. बगळ्यांच्या आणखीही काही जाती भारतात दिसून येतात. परंतु ह्या तीन जातींइतक्या त्या सगळीकडे दिसत नाहीत.



# पोपट



पोपट

चिमणी, कावळा, कबुतर, घार, मैना या पक्ष्यांइतका तरी पोपट मनुष्यवस्तीच्या आसपास मोठ्या प्रमाणावर दिसत नसला तरी तो आपल्याला चांगला माहीत आहे. कारण कित्येकांच्या घरी तो पाळलेला दिसतो. पोपट शिकविल्याप्रमाणे सर्व हुबेहूब बोलतो म्हणून तर कित्येक लोक त्याला पिंजऱ्यात ठेवून आपल्या घरी पाळतात.

पोपटांच्या अनेक जाती आहेत. बहुसंख्य जातीच्या पोपटांचे अंग प्रामुख्याने हिरवे असून डोक्याजवळ लालसर झाक दिसून येते. पोपटाची चोच मोठी असून बाकडी असते. त्याच्या हिरव्या अंगाला लालभडक चोच फारच उठून दिसते. आपल्या येथे जास्तकरून जो पोपट दिसतो त्याच्या गळ्यावर गुलाबी



गोलसर पट्टा असतो. ह्याचे अंग गर्द हिरवे असून चोच लालभडक असते. गळ्यावरच्या गुलाबी रिंगणाभोवती थोडीशी काळ्या रंगाची कड असते. ह्याची शेपटी लांब असून टोकदार असते. मादीच्या गळ्यावर काळा पट्टा नसतो. हे पक्षी थव्या-थव्यांनी राहतात.

पिकात दाणा भरू लागला की यांच्या झुंडीच्या झुंडी शेतात उतरतात आणि बरेचसे धान्य फस्त करतात. पेरूच्या बागायत-दारांना पोपट म्हणजे हे एक फार मोठे संकट वाटते. कारण कच्चे पेरू अर्धवट खाऊन टाकून ते त्यांची नासाडी करतात. अशा प्रकारे पोपटांपासून अन्नधान्याच्या पिकांना तसेच बागायतीला मोठ्या प्रमाणावर नुकसान पोचते.

पोपट रात्रीच्या वेळी चिमण्यांप्रमाणेच एक मोठेसे झाड निवडून त्यावर आश्रय घेतात. ते फांद्यांना उलटे लटकतात. डहाळ्यांना ते आपल्या पायाच्या पंजांनी इतके घट्ट पकडून ठेवतात की झोपेत वाऱ्याने डहाळ्या हलत असल्या तरी ते खाली पडत नाहीत. पोपट अंडी ठेवण्याकरिता घरटी बांधत नाहीत. मोठमोठ्या झाडांच्या बुंध्यांना असलेल्या ढोलीचा उपयोग ते घरट्यासारखा करतात.

बहुतेक पक्षी आपले खाणे बकाबक गिळतात. त्यामुळे गोड, कडू, आंबट अशा पदार्थांच्या चवीचा त्यांच्यावर परिणाम होऊ शकत नाही. परंतु पोपटांना मात्र चव-वास कळतो. चव घेत मोठ्या मजेने पोपट पेरू खातो. शरीर साफ ठेवणे, पिसांची साफसफाई करणे, अस्ताव्यस्त पिसांना सरळ करून व्यवस्थित बसविणे इ. गोष्टीत पोपटांचा खूप वेळ जातो. ती त्यांची सवय असते. शरीरसफाईच्या ह्या कामाव्यतिरिक्त पोपटांना डहाळ्यांना

उलटे लटकून झोके घेण्याचीही एक सवय असते. झोके घेण्यात ते अगदी रंगून जातात.

पोपटांची बुद्धी थोडी तल्लखच म्हणावी लागेल, कारण आपण शिकविलेले शब्द, तसेच वाक्ये देखील त्यांच्याबरोबर लक्षात राहतात. त्याप्रमाणे ते आवाज काढतात.

पोपट नेहमी थव्याथव्यांनी जंगलात राहतात. परंतु केव्हा केव्हा गावाबाहेर किंवा शहरवस्तीतही पळस, पिंपळ अशा जुन्या वृक्षांवरही ते मोठ्या संख्येने दिसतात. दिवसभर त्यांचा फारच गोंगाट चालतो. धान्य, पेरू, आंबे इत्यादींबरोबर ते वडाउंबरांची फळे, काही प्रकारची फुले, व फुलातील मध देखील खातात.



# कोंबडा



कोंबडा

तांबडे फुटले की कोंबड्यांची ‘कुकु च — कू क’ अशी लांबलचक बांग कानावर पडते. हा आवाज आपल्या सर्वांच्या अगदी



बालपणापासून ओळखीचा आहे. गावात, खेड्यापाड्यात तर घरोघरी कोंबड्या पाळून त्यांची पैदास केली जाते. तेथे तर कोंबडा आरवला की गावकरी उठू लागतात. गजबजलेल्या शहरवस्तीतही कितीतरी लोक कोंबड्या पाळताना दिसतात. आपण ज्या कोंबड्या घरी पाळतो त्यांचा उगम जंगली कोंबड्यातच आहे. आज आपल्याला कोंबड्यांच्या अनेक संकरित जाती आढळतात. त्यामुळे कित्येक जाती मुळच्या जंगली कोंबड्यांसारख्या दिसत नाहीत. त्यांच्या रंगरूपात अनेक बदल झालेले दिसून येतात.

कोंबडा व कोंबडी यांतील फरक सहज लक्षात येण्याजोगा असतो. कोंबड्याच्या डोक्यावरचा लालभडक तुरा अगदी उठावदारपणे दिसतो तर कोंबडीच्या डोक्यावर, तो किंचितसा विशेष लक्षात न येईल असा असतो. नर कोंबड्यांचे रंग साधारणतः उठावदार असतात. त्यात लाल, तांबड्या, हिरव्या, निळ्या, काळ्या, पिवळ्या वगैरे सर्व रंगाच्या पिसांचे मिश्रण असते. माद्या साधारणतः काळ्या, कबऱ्या, मातकट रंगाच्या असतात. नराचे शेपूट मोठे असून वर वळलेले असते. नराचा लालभडक तुरा, भडक चकाकते रंग आणि बाकदार शेपूट यामुळे तो जास्त रुबाबदार दिसतो. काही जातींच्या नरांच्या गालावर देखील तुऱ्याच्या लोंबत्या पाळ्या असतात. माद्या मात्र साधारणच असतात.

कोंबड्यांची अंडी हा पौष्टिक आहार समजला जातो. त्यामध्ये ‘अ’ जीवनसत्त्व मोठ्या प्रमाणावर असते. म्हणून कोंबड्यांची पैदास मोठ्या प्रमाणावर केली जाते. अंडी मोठ्या प्रमाणावर मिळावीत म्हणून ‘व्हाईट लेगहॉर्न’ (इंग्लिश कोंबडी) आणि ‘रोड आयलंड’ ह्या जातीच्या कोंबड्यांची निपज मोठ्या

प्रमाणावर होऊ लागली आहे. ह्या कोंबड्यांची अंडी गावठी कोंबडीपेक्षा आकाराने मोठी असतात. मांसाहार घेणाऱ्या लोकांत अंड्याशिवाय कोंबडीच्या मांसाला देखील मोठीच मागणी असते. कोंबडीचे मांस पौष्टिक असून जास्त रुचकर व चविष्ट असते. म्हणून खाण्याकरिता देखील त्यांचा जास्त वापर केला जातो. अलिकडे याकरिता देखील कुक्कुटपालनाचा धंदा करणारे लोक अंडी फुटून पिले बाहेर आल्यानंतर सहा ते आठ आठवड्यांपर्यंत त्यांना विशिष्ट आहार देऊन वाढवितात आणि ह्या कोंबड्या फक्त खाण्याकरिता म्हणून विकण्यात येतात. कोंबड्या कापून, सोलून, आतून स्वच्छ करून मग त्या बर्फात साठवून ठेवून विकतात.

पूर्वीच्या काळात कोंबड्यांच्या झुंजी हा एक शर्थीचा खेळ मानला जाई. झुंजीसाठी ज्या प्रकारच्या कोंबड्या वापरल्या जात त्यांच्या पायाला एक एक नख जास्त असते. ते नख तीक्ष्ण असून त्याला छोटे चाकू बांधण्यात येत. झुंजी प्राणपणाने खेळविल्या जात. विजयी कोंबड्यांचा वीरप्रमाणे सत्कार करण्यात येई. अजूनही काही भागात अशा झुंजी चालतात.





# बदक



बदक

कोंबडीसारखाच दुसरा पाळीव पक्षी आहे बदक. बदके पाण्यात राहतात. पाण्यात पोहता यावे म्हणून बदकाच्या पायाच्या बोटांना पडदे असतात. बदकांच्या अनेक जाती आहेत. अनेक जंगली बदके पाण्यात जशी उत्तम रितीने पोहतात, तशीच हवेतही उडू शकतात. कडक हिवाळ्याला सुरुवात झाली, की रशिया, युरोप ह्यासारख्या दूरवरच्या देशांतून, चार-पाच हजार मैलांचे उड्डाण करून, मोठी जंगली कबुतरे भारतात येतात.

आपले पाळीव बदक म्हणजे अशाच एका प्रकारच्या जंगली बदकापासून तयार झालेली संकरित जात आहे. पाळीव बदक फारसे उडू शकत नाही. खाण्याकरिता मोठ्या प्रमाणावर उपयोग होतो. कित्येक लोक बदक देखील कोंबडीसारखी खातात. परंतु त्यांचे मांस थोडे चोथट असते.



# पाणकोंबडी



पाणकोंबडी

गावाकडील लोक साधारणतः पाण्यात दिसणाऱ्या कोंबडी-सारख्या कुठल्याही पक्ष्याला पाणकोंबडी म्हणतात. यामध्ये चांदणा पांढऱ्या छातीची पाणकोंबडी, पाणडुबी इ. पक्ष्यांचा समावेश होतो.

पांढऱ्या छातीच्या पाणकोंबडीचा रंग वरून मातकट काळसर असा असतो. दोन्ही बाजूस डोळ्यापासून पांढरट रंगाचा पट्टा निघून मानेवरून सबंध छातीवर तो पसरल्यासारखा वाटतो. आतील बाजूने शेपटाकडे शेंदरी रंग दिसून येतो. या पक्ष्याला शेपूट जवळजवळ नसतेच म्हटले तरी चालेल. चोच हिरवट रंगाची असून तिच्या जरा वरचा भाग लाल रंगाचा असतो.

पाणकोंबड्या नेहमी पाणथळ, दलदलीच्या जागा, डबकी अथवा नदीओढ्यांच्या काठाला दिसतात. त्या एकेकट्या किंवा जोडीनेही दिसतात. पावसाळ्यात जेव्हा खाचखळगे, डबकी



पाण्याने तुडुंब भरून जातात तेव्हा त्या दलदलीतून तुरुतुरु चालत, चिखलात सापडतील ते किडे, कीटक, शंखशिंपल्यातील जीव, धान्याचे दाणे आणि पाणवनस्पती खाण्याकरिता उघड्यावरही आलेल्या दिसतात. अशा त्या तुरुतुरु धावत असताना त्यांचे भुंडे शेपूट सारखे हालत राहाते आणि शेपटाखालचा भडक शेंदरी रंग ठळकपणे नजरेत भरतो.

यांचा विणीचा हंगाम पावसाळ्यात असतो. तेव्हा नर 'कर्रर-क्वॅक क्वॅक कर्रर-क्वॅक क्वॅक ......कोक् कोक् कोक्' असा मोठमोठ्याने आवाज करून माद्यांना बोलावत असतात. ह्या पाणकोंबड्या, नदीतळ्यांच्या काठाला उगवलेल्या वनस्पतींच्या जाळीत छोट्या झुडपांवर काड्या-काटक्या जमवून कपाच्या आकाराचे छोटेसे घरटे तयार करतात. एका वेळेला सहा-सात अंडी घालतात. अंडी गुलवट रंगाची असून त्यावर चिखलाचे डाग उडाल्यासारखे मातकट रंगाचे डाग असतात.

ह्या पाणकोंबडीशिवाय, नदीतळ्यात साधारणतः सप्टेंबर-ऑक्टोबरपासून एक नवीनच पक्षी दिसू लागतो. उदी-काळसर रंगाचा हा पक्षी काठावर मातीत बसला असताना कसातरी पिपासारखा लंबोळका दिसतो. परंतु पाण्यात पोहू लागला की अर्धवट शरीर पाण्यात बुडालेले असल्यामुळे सुबक वाटतो. त्याच्या डोक्यावरील चंद्रकोरीच्यासारखा चांदीच्या रंगाचा भाग आणि लाल चोच यामुळे तर तो जास्तीच खुलून दिसतो. ह्या पक्ष्याला चांदवा असे म्हणतात. कित्येक लोक ही देखील एक-प्रकारची पाणकोंबडी असेच समजतात.

याशिवाय तळ्याच्या पाण्यात छोट्या छोट्या पाणडुब्या दिसतात. खरोखर पाहता ही एकप्रकारची छोटी बदकेच असतात. परंतु कित्येक लोक तिला पाणकोंबडी असेच समजतात. ह्या

लालसर मातकट रंगाच्या असून त्या उत्तम प्रकारे पोहतात. पण त्यांना विशेप लांबवर असे उडता येत नाही पाण्यात पोहत असताना पाणडुबी मध्येच खाली बुडी मारून दिसेनाशी होते. थोडया वेळाने पुन्हा बाहेर पाण्यावर येते.

ह्या सर्व पक्ष्यांचे खाद्य पाण्यातच असते. मासे, छोटे बेडूक, बेडकांची पिल्ले, काठावरील चिखलात असणारे शंखशिंपल्यांतील जीव, पाणवनस्पतींचे कोवळे अंकुर, तळ्याच्या काठावरील गवताचे बी इत्यादी सर्व काही त्यांना चालते.



# घार



घार

घार हा पक्षी चिमणी-कावळ्याप्रमाणेच मनुष्यवस्तीच्या आसपास दिसून येतो. घारी आकाराने डोमकावळ्यापेक्षा बऱ्याच मोठ्या असतात. घारीचे अनेक प्रकार दिसून येतात. पण 'साधी' घार आणि 'ब्राह्मणी' घार या दोन जाती प्रामुख्याने शहरात तसेच गावाकडे दिसून येतात.

साधी घार मातकट काळसर रंगाची असून तिची शेपटी शेवटाला दुभागलेली असते. उडताना त्या शेपटीचा दुभागलेला आकार सहज लक्षात येतो. खाटीकखाने, मासळीबाजार, कचऱ्याचे मोठे साठे, बंदराजवळचा समुद्र किनारा इत्यादी ठिकाणी त्या मोठ्या प्रमाणावर घिरट्या घालीत असताना दिसतात.

घार इतकी चपळ असते की दुरवरूनच भक्ष्य हेरून मोठमोठ्या इमारती, रस्त्यावरील पादचारी, वाहने, टेलिफोनच्या-विजेच्या तारा आणि इतर अडथळे ह्या सर्वांना चुकवून विजेच्या चपळाईने

झटकन येऊन भक्ष्यावर झडप घालून ते घेऊन जाते. घारी रस्त्यावर मरून पडलेल्या उंदरापासून ते पाली, सरडे, मांस-मासळी, छोटे साप, कोंबडीची पिले, घाण, कचरा इ. सर्व खातात.

घारी ससाणे, घुबड, गिधाड इ. प्रकारचे सर्व पक्षी मांसभक्षक असल्यामुळे त्यांच्या चोची आणि पायाच्या नखया विशिष्ट प्रकारे मोठ्या, वाकदार व तीक्ष्ण असून मजबूत असतात. मांस फाडून, तोडून खाण्यासाठी अशा चोची व नख्या त्यांना उपयोगी पडतात. पुष्कळदा घारी कोंबड्यांची छोटी पिले, उचलून घेऊन जातात. त्यामुळे कोंबड्यांची पैदास करणाऱ्यांना घारी म्हणजे एक संकटच वाटते.

घारींची घरटी उंच अशा झाडांच्या फांद्याकडील भागात असतात. घरटी जाडजुड काड्यांची असतात. थोडीशी अस्ताव्यस्त अशीच असतात. ब्राह्मणी घारही आकाराने साध्या घारीपेक्षा थोडीशी लहान असते. ती विटकरी लाल रंगाची असून तिच्या छातीपासून चोचीपर्यंतचा भाग पांढराशुभ्र असतो. शरीराच्या इतर विटकरी रंगाला हा पांढराशुभ्र रंग कॉलरप्रमाणे उठून दिसतो. नीट निरखुन पाहिल्यास ह्या पांढऱ्या रंगावर मधून मधून बारीक मातकट रंगाच्या रेषा दिसून येतात.

ब्राह्मणी घार बहुधा माशांवर उपजीविका करीत असल्याने, ती नदी-तळी-ओढ्यांच्या तसेच समुद्राच्या काठाला जास्तकरून दिसून येतात. त्यांची घरटी देखील अशाच काठाकाठात दिसणाऱ्या झाडांवर असतात. तरीही मनुष्यवस्तीच्या आसपास असल्यास ती घार साध्या घारीप्रमाणेच पाली, सरडे, बेडूक, शेतातील खेकडे, कचऱ्याच्या ढिगाऱ्यातील मरून पडलेले उंदीर इत्यादी खाते. पावसाळ्यापूर्वी जेव्हा वाळव्यांना पंख फुटतात तेव्हा



या दोन्ही प्रकारच्या घारी त्यांच्यावर तुटून पडतात. घारी साधारणतः भक्ष्यावर झडप घालावयास खाली येताना की-ई-ई-वी वी वी वी अशी कर्कश्य शीळ घालतात.

घार-ससाणा यासारखे पक्षी शेतकऱ्यांना आवडत नाहीत. कारण ते त्यांच्या शेतावरील पक्षी आणि कोंबड्यांची पिले पळवीत असतात. परंतु हे पक्षी शेतामधील पिकांची नासाडी करणाऱ्या घुशी-उंदीर-खारी यांची शिकार करीत असतात. तसेच साथीचे प्राणघातक रोग फैलावणारे अपायकारक किडे हे पक्षी फस्त करून टाकतात. मृत प्राणी आणि घाण हे पक्षी चटकन उचलतात आणि आपले रस्ते व खेडी स्वच्छ ठेवतात.



# ससाणा



ससाणा

ससाणा हा पक्षीदेखील घारी, गिधाडे, घुबडे, यांप्रमाणे मांसभक्षक पक्षी आहे. तो घारीप्रमाणेच किंबहुना थोडा अधिकच चपळ असा पक्षी आहे. ससाणा घारीहून थोडा लहान, जवळ जवळ डोमकावळ्याच्या आकाराचा पक्षी आहे. पूर्ण वाढलेल्या ससाण्याची पाठ उदी रंगाची असून डोके काळे असते. गालावर काळसर पट्टा असतो. छाती गुलबट असून पोटावर गंजासारखा रंग असतो. नरापेक्षा मादी मोठी असते. ससाणा मुख्यतः कबुतर, पोपट, बुलबुल ह्यासारख्या पक्ष्यांना पकडून खातो. भक्ष्य पकडताना त्याची चपळाई पहात रहावी अशी असते. त्याला



उडताना मुळीच कष्ट घ्यावे लागत नाहीत. एक-दोन वेळा पंख खालीवर फडफडून, हवा भरून घेऊन तो हवेत तरंगत रहातो. भक्ष्यावर एकदम तीरासारखा जाऊन, डोळ्याचे पाते लवते न लवते इतक्यात तो झडप घालतो.

पूर्वी ससाण्यांना पाळून पक्ष्यांची शिकार करण्याचे शिक्षण दिले जाई. ससाण्यांना अशा प्रकारे शिक्षण दिल्यानंतर त्यांना खास राजेरजवाडे शिकारीसाठी घेऊन जात असत. नेताना त्यांच्या डोळ्यांवर काळे फडके बांधण्यात येत असे. त्यामुळे त्याला एकीकडून दुसरीकडे नेणे सोईस्कर होई. नंतर त्याच्या डोळ्यावरचे फडके काढून आकाशातील पक्षी दाखविला जाई. तावडतोब ससाणा चपळाईने जाऊन विजेच्या गतीने पक्ष्यावर झडप घालून त्या पक्ष्याला आपल्या मालकाकडे आणून देई. हल्ली अशा शिकारीवर बंधने घालण्यात आली आहेत.

◇

# घुबड



घुबड

'हूक-हूट-हूक' असा घुबडाचा आवाज, रात्रीच्या शांत वेळी कानावर पडला की पुष्कळांना उगीचच भीती वाटते. घुबडाचे ओरडणे अशुभ असते, अपशकुन करणारे असते, अशीही अनेकांची समजूत झालेली आहे. घुबड दिसणे म्हणजे काही तरी वाईट घडणे असाही पुष्कळांचा समज आहे. पण हे सर्व मनाचे खेळ आहेत. त्यात खरे काहीही नाही.

घुबडाचे डोळे गोल आणि वटवटीत असतात. त्यामध्ये त्याची मोठी बाकदार चोच असते. त्याची पिसे मऊशार असतात.

घुबडांच्या जवळजवळ १३३ जाती सर्व जगात आढळतात. त्यापैकी जाती आणि उपजाती मिळून ६० प्रकारची घुबडे आपल्या येथे दिसतात. त्यात अगदी लहान तर काही खूपच मोठी असतात. सर्वांत छोटे घुबड केवळ ५ इंचाचे आहे. त्याला 'बुटके घुबड' असे म्हणतात. मोठ्यात मोठे घुबड साधारणतः अडीच फूट इतके मोठे असू शकते. नर आणि मादी बाबतः जवळ जवळ सारखीच दिसतात. साधारणतः मादी नरापेक्षा मोठी असते.



मोठेसे गोलाकार डोके, गोल गरगरीत भेदक डोळे, छोटीशी बाकदार तीक्ष्ण चोच, तशाच वळलेल्या तीक्ष्ण नख्या, वसके शरीर अशी साधारणतः सर्व घुबडांची ठेवण असते. उंदीर घुशीसारखे छोटे छोटे सस्तन प्राणी, पक्षी, किडे, पाली, सरडे हे त्यांचे प्रमुख खाद्य. काही घुबडांचे फक्त मास हेच खाद्य असते.

घुबडांच्या अनेक जातीपैकी जवळजवळ २–३ जातींची घुबडे आपले खाद्य संध्याकाळपासून दिवस उजाडेपर्यंत मिळवितात. दिवस उजाडताच मात्र त्यांची रात्र सुरू होते. साधारणतः दिवसा घुबडे झाडांच्या ढोलीमध्ये झोपून रहातात.

बहुतेक घुबडे आपले अन्न जमिनीवरून मिळवितात. त्यांची पिसे मऊशार असल्याने पंखांची उघडझाप करताना अजिबात आवाज होत नाही. त्यांचे मोठे गोल डोळे दुर्बिणीप्रमाणे तीक्ष्ण असल्याने अंधुक जागीही त्यांना स्वच्छ दिसू शकते. (गडद काळोखात मात्र त्यांना दिसत नाही) घुबडाची श्रवणशक्तीही तीव्र असते.

बहुतेक करून घुबडाचा रंग मळकट पांढऱ्यापासून मातकट चॉकलेटी असतो. त्याच्या पिसांवर बारीक बारीक ठिपके किंवा तुटक तुटक रेषा असतात. पोटाकडे हा रंग फिकट असलेला दिसतो. घुबडाच्या एका जातीला दोन कानावर शिंगासारखे दिसतील असे पिसांचे झुबके असतात. त्याला 'शिंगवाले घुबड' असे नाव आहे.

बहुसंख्य घुबडे घरटी बांधण्याच्या भानगडीत न पडता दुसऱ्या पक्ष्यांची जुनी घरटी बळकावतात. तर कित्येक लहान जातींची

घुबडे झाडाच्या छोट्या छोट्या ढोलींचा किंवा खडक-कपारींचा आश्रय घेतात.

भारतात सापडणाऱ्या घुबडांच्या जवळजवळ १२ प्रमुख जाती आहेत. त्यापैकी सर्वांत छोट्या जातीच्या घुबडाला 'पिंगळा' असे म्हणतात. पिंगळा जरी घुबडासारखा रात्री फिरणारा असला तरी कधी कधी मळभ आलेले असताना, दिवसादेखील बाहेर दिसतो. पिंगळा साधारणतः मोठ-मोठे कीटक, पाली, सरडे, छोटे उंदीर खातो. केव्हा केव्हा नदी-किनारच्या झाडाजवळ त्याची वस्ती असल्यास किनाऱ्याजवळ असणाऱ्या शंख-शिंपल्यांतील जीव खाताना दिसतो. पिंगळे घरट्यासाठी झाडांच्या ढोलींचा उपयोग करतात. केव्हा केव्हा सुतार, तांबट ह्या पक्ष्यांनी सोडून दिलेल्या ढोलीदेखील ते वापरतात. पिंगळ्याची मादी एका वेळेस तीन ते चार अंडी घालते. साधारणतः मार्च ते मे च्या दरम्यान त्यांची अंडी दिसून येतात.

घारी, गिधाडे, घुबड इ. सर्व पक्षी मांसभक्षक पक्षी म्हणून ओळखले जातात. त्यांना मांस फाडून, तोडून, ओरबाडून खावे लागते. याकरिता त्यांच्या पायाच्या नख्या तीक्ष्ण, मोठ्या व बाकदार अशा असतात. त्याचबरोबर त्यांच्या चोचीही धारदार आणि बाकदार असतात.





# गिधाड



गिधाड

गिधाड हे नाव ऐकताच किळस वाटते आणि त्याला कारण देखील तसेच आहे. गिधाडे सडक्या कुजक्या प्रेतांवर तुटून पडतात. गिधाडाला ताज्या मांसापेक्षा नासकेकुजके मांसच अधिक आवडते. पण गिधाड जरी मांसाहारी असले तरी ते कधीही कुठल्याच प्रकारच्या जिवंत प्राण्याला ठार मारून खात नाही. केवळ मेलेल्या जनावरांचेच ते मास खाते. पण गिधाडे आपल्याला वाटतात तेवढी घाण नसतात. कारण असे दिसून आले आहे की, मेलेल्या प्राण्यांच्या मांसावर मेजवानी झोडल्यावर गिधाडे आंघोळीकरिता नदी-विहिरीकडे धाव घेतात आणि सर्व अंग धुऊन काढतात.

गिधाडांच्या जवळजवळ आठ जाती आपल्या भारतात दिसून येतात. त्यापैकी काही जाती फक्त मांसावरच आपली उपजीविका करतात. ह्या गिधाडांच्या मानेवर पिसे अजिबात नसतात. त्यामुळे

त्यांच्या मानेवरील लाल रंगाची कातडी उघडी पडल्यासारखी दिसते. मेलेल्या जनावरांच्या बरगड्या तसेच इतर हाडांच्या आत जाऊन मांस ओढून काढून घेण्यासाठी त्यांची ही उघडी मान सोईची पडते. इतर काही जातींची गिधाडे प्राण्यांच्या मांसाबरोबरच, प्राण्यांची व मानवाची विष्ठा तसेच इतर घाण कचरा हे देखील खातात. ह्या गिधाडाची मान पिसांनी जास्त झाकलेली असते. पांढऱ्या पाठीचे गिधाड गावात तसेच शहरात भर वस्तीच्या ठिकाणी देखील सर्वत्र दिसते. पारशी लोकांमध्ये प्रेताला न पुरता ते तसेच विहिरीवर ठेवण्यात येते. नंतर त्या प्रेताची विल्हेवाट गिधाडे लावतात. त्यात प्रामुख्याने ही पांढऱ्या पाठीचीच गिधाडे दिसून येतात.

वेगवेगळ्या जातींच्या गिधाडांची घरटी वेगवेगळ्या प्रकारची असतात. पांढऱ्या पाठीची गिधाडे मोठ्या झाडांवर काटक्याकुटक्यांचे भले मोठे घरटे करतात, तर लांब चोचीची गिधाडे खडक-कपारीतील बोगद्यांचा उपयोग घरट्यासारखा करतात. 'सफेत गिधाड' या नावाने ओळखले जाणारे गिधाड आपले घरटे पडक्या इमारतींच्या फळकुटावर किंवा खडकाच्या सुळक्यावर करते. कधी कधी ही गिधाडे झाडांच्या फांद्यांच्या ढुंबळ्यामध्येही घरटी करतात. ही घरटी काटक्यांची असून त्यात प्राण्यांची कातडी, केस, चिंध्या आणि कचरा यांचा भरणा असतो.

पांढऱ्या पाठीची व लांब चोचीची गिधाडे इतर गिधाडांपेक्षा वजनाला कमी असतात. ती साधारणतः चार ते पाच किलो भरतात. इतर काही जातींच्या गिधाडांचे वजन सात ते आठ किलो देखील असते. गिधाडांमध्ये 'राजगीध' म्हणून एक जात आहे. ते दिसायला इतर गिधाडांपेक्षा चांगले असते. काहीजण यालाच 'गरुड' पक्षी म्हणून ओळखतात. त्याचे पाय लालभडक



असून डोक्यावरून भल्या मोठ्या तुऱ्याच्या दोन पाऱ्या खाली लोंबत असतात.

सर्व जातींमध्ये सफेत गिधाड लहान आहे. हे गिधाड मिळेल ते सर्व खाते. इतकेच काय पण ते निरनिराळ्या प्राण्यांची विष्ठा देखील खाते.

भारतात सापडणाऱ्या सर्व पक्ष्यांत उंचीच्या दृष्टीने पहिल्यास सारंग पक्षी सर्वात मोठा म्हणता येईल. ( सारंग Sargs Crane ) परंतु पक्ष्यांचे दोन्ही पंख पूर्ण पसरवून त्यांची लांबी एका टोकापासून दुसऱ्या टोकांपर्यंत ( Wing Span ) मोजल्यास सर्वात मोठा पक्षी म्हणजे हिमालयात दिसून येणारे एक गिधाड आहे. ह्या गिधाडाला चोचीखाली गळ्यावर केसासारखा पिसांचा झुबका असतो. ह्याला 'हिमालयातील दाढीवाले गिधाड' म्हणतात.

एकंदरीत गिधाड जरी कुजके नासके मांस खाणारा व दिसायला देखील घाणेरडा असा पक्षी असला तरी तो सर्व घाण खाऊन गावाची तसेच जंगलांची साफसफाई करणारा पक्षी आहे. तेव्हा निसर्गाचा समतोल राखण्याकरिता ह्या पक्ष्यांची देखील खूप आवश्यकता आहेच.

# शहामृग



शहामृग

अजूनपर्यंत आपण जे सर्व पक्षी पाहिले ते आपल्या देशात दिसून येणारे पक्षी होते. शहामृग हा काही आपल्या देशातील पक्षी नाही, पण आपल्याकडे हा पक्षी प्राणिसंग्रहालयात ठेवलेला दिसतो. शहामृगाला तो पक्षी असूनही उडता येत नाही. परंतु तो जमिनीवर फार वेगाने धावतो. या कामी त्याचे लांबलचक पाय त्याच्या फारच उपयोगी पडतात. सर्व पक्ष्यांत शहामृग हा मोठा पक्षी आहे. पूर्ण वाढलेला नर पक्षी जवळजवळ सात-आठ फूट



उंच असतो. मादी त्याच्याहून थोडी कमी उंच असते. ह्या उंचीमध्ये त्याची मानच जवळजवळ साडेतीन ते चार फूट असते. त्याचे वजनही जवळजवळ तीनशे पौंडांपर्यंत असू शकते. शहामृगाच्या मानेवर आणि पायांवर विशेष अशी पिसे नसल्यामुळे तिथली गुलाबी कातडी उघडी पडल्यासारखी वाटते. नराच्या शरीरावरील पिसांचा रंग काळा असून त्याच्या शेपटीवर आणि पंखावर झालरीसारखी पांढरी पिसे असतात. मादी मातकट रंगाची असते. ह्या पक्ष्याच्या डोळ्याच्या पापण्यांना लांब लांब केस असतात. ह्याच्या पायाला दोन मजबूत बोटे असतात. मोठ्या बोटाला जाडसे नख असते.

शहामृग पूर्व आफ्रिका, सीरिया आणि अरेबियामधील वाळवंटी प्रदेशात आढळतात. ऑस्ट्रेलियाच्या काही भागांतूनही हा पक्षी दिसून येतो. साधारणत: शहामृग मोटमोठ्या कळपा-कळपांनी रहातात आणि खाद्य शोधण्यासाठी फिरतात. पाणीपुरवठा जास्त असलेल्या जागी आल्यावर मात्र ते कुटुंबा-कुटुंबाने रहातात. एक नर, दोन-तीन माद्या व छोटी पिले यांचे एक कुटुंब असते. अशी अनेक कुटुंबे एकत्र येऊन त्यांचा एक मोटा कळप तयार होतो. एखादा अनुभवी नर मोठ्या कळपाचा नेता असतो. चरण्याच्या जागा हाच नर ठरवितो. आणि सर्व कळप त्याप्रमाणे हालचाली करतो. शहामृग झाडा-झुडपांचा पाला, फळे, बिया वगैरे खातात. रखरखीत प्रदेशात त्यांना निवडुंगा-सारख्या मांसल खोडे असलेल्या वनस्पती खाल्याने पाणी मिळते. पाने, फुले, फळे या शाकाहाराबरोबर शहामृग छोटे छोटे प्राणी, पाली, सरडे, छोटी कासवे इत्यादी देखील खातात. शहामृग खाल्लेले अन्न पचविण्यासाठी पुष्कळशी वाळूदेखील मधून मधून खातात.

पावसाळ्याच्या सुरुवातीला ह्या पक्ष्यांचा विणीचा हंगाम असतो. ह्या दिवसांत नराच्या डोक्याचा व पायाचा रंग अधिकच गुलाबी बनतो. एकेक नराच्या तीन-चार माद्या असतात. मादी एका वेळी सहा ते आठ अंडी घालते. ह्या पक्ष्याच्या आकारा-प्रमाणेच त्याचे अंडेदेखील खूपच मोठे असते. एकेक अंडे सहा इंच लांब असून त्याचे वजन अडीच पौंडांपर्यंत असू शकते. त्याचे घरटे म्हणजे जमिनीत खणलेला एक खोलगट खड्डाच. तो जवळ जवळ नऊ फूट व्यासाचा असतो. एकेका नराची प्रत्येक मादी वेगवेगळे घरटे न करता सर्वजणी एकत्रच अंडी घालतात. सर्व अंडी घालून होण्यालाच सुमारे तीन आठवड्यांचा अवधी लागतो. त्यानंतर सर्व माद्यांमधील जी जास्त बलवान असते, ती दुसऱ्या माद्यांना हाकलून देऊन ती आणि नर घरट्यात राहून अंड्यांची काळजी घेतात. ह्या उष्ण प्रदेशात हे पक्षी अंड्यावर बसून अंड्यांना उबविण्यापेक्षा मधून मधून पंखांनी अंड्यांना वारा घालून ती थंड ठेवण्याचा प्रयत्न करतात. जवळजवळ सहा आठवड्यांनंतर अंड्यातून पिले बाहेर येतात. पिले बाहेर आल्यापासूनच धावू शकतात. तरीही अंड्यांना व छोट्या पिलांना कोल्हा-लांडग्यांचे भय असते. महिनाभरात पिले ताशी तीसएक मैल वेगाने धावू शकतात. छोट्या पिलांच्या अंगावर गडद व फिकट रंगाचे मोठे मोठे पट्टे असतात. सुमारे चार ते पाच वर्षांनी ती वयात येतात.

शहामृगाच्या लांब लांब मानांमुळे त्यांना शत्रूची लांबवरूनच चाहूल लागते आणि लांबलचक पाय असल्याने ते खूप वेगाने दूर पळून जातात. शहामृग ताशी चाळीस मैल वेगाने धावते.

